यांत्रिकी संघटनेमार्फत करण्यात येणाऱ्या द्वार निर्मिती / उभारणी / दुरुस्ती इत्यादी कामे खाजगी अभिकरणामार्फत न करता यांत्रिकी विभागाकडे असलेल्या दापोडी व इतर प्रादेशिक कर्मशाळेमार्फत करणेबाबत

## महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण १०१४/(प्र.क्र.१५८/२०१४)/यांत्रिकी

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २८.१०.२०१४

संदर्भ:- शासनाचे पत्र क्र.संकीर्ण २०१३/ (प्र.क्र.३१६/१३)/यांत्रिकी, दि.२१.१.२०१४

## शासन परिपत्रक

यांत्रिकी संघटनेमार्फत जलसंपदा विभागातील विविध कामे स्थापत्य अभियांत्रिकीच्या क्षेत्रीय परिस्थितीनुसार करण्यात येतात. यामध्ये प्रामुख्याने धरणाच्या सांडव्यावरील वक्रद्वारांची, मुख्य विमोचकांची, मुख्य कालव्यावरील विविध द्वारांची उभारणी, मोठया नदीवरील बॅरेजस् च्या द्वारांची निर्मिती इत्यादी कामे प्रामुख्याने करण्यात येतात. या व्यतिरिक्त जलसंपदा विभागाच्या धरणावरील द्वारांची सांडव्यावरील व इतर विविध द्वारांची दुरुस्ती ही यांत्रिकी संघटनेमार्फत करण्यात येते.

मागील ५-६ वर्षामध्ये यांत्रिकी संघटनेमार्फत करण्यात येणाऱ्या कामांच्या पध्दतींमध्ये बदल झालेला दिसून येत असून काही कामे खाजगी अभिकरणामार्फत करुन घेण्याचा कल निदर्शनास येत आहे. यापुढील कालावधीत यांत्रिकी संघटनेमार्फत करण्यात येणाऱ्या कामाकाजामध्ये सुधारणा करण्याच्या द्दष्टीकोनातून व जास्तीत जास्त कामे यांत्रिकी संघटनेच्या उपलब्ध असलेल्या दापोडी व प्रादेशिक कर्मशाळेमार्फत केली जावीत याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे.

**शासनाचे निर्देश :-**

जलसंपदा विभागामार्फत करण्यात येणाऱ्या धरणांच्या सर्व प्रकारच्या द्वारांची निर्मिती / उभारणी, कालव्यांवरील विविध प्रकारची द्वारे, बॅरेजस् च्या द्वारांची निर्मिती / उभारणी तसेच धरणांवरील, कालवा व बॅरेजस् वरील द्वारांची विशेष व नियमित दुरुस्ती मातीकामांची संयंत्रे दुरुस्ती, यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध असलेल्या दापोडी व विविध प्रादेशिक कर्मशाळा यामधील साधन सामुग्री, उपकरणे, मनुष्यबळ यांचा कार्यक्षमपणे वापर करुन खातेअंतर्गत (Departmentally) सर्व कामे स्थापत्य विभागाच्या मागणीप्रमाणे पूर्ण करावीत.

स्थापत्य विभागाने मागणी केल्याप्रमाणे सर्व प्रकारच्या द्वार निर्मिती / उभारणी, विशेष व नियमित दुरुस्तींची मातीकामांची संयंत्रे दुरुस्ती कामे खात्यातील आस्थापनेकडून करावीत.

अपवादात्मक परिस्थितीमध्ये जर यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध असलेली दापोडी कर्मशाळा व विविध प्रादेशिक कर्मशाळेमध्ये एखादी बाब उपलब्ध यंत्रसामुग्री, साधन सामुग्री, उपकरणे, मनुष्यबळ यांचा वापर करुन ही करणे शक्य नसेल तर या बाबतचा सविस्तर अहवाल शासनाकडे सादर करुन शासनाची पूर्व परवानगी घेऊन सदरील कामे खाजगी अभिकरणामार्फत (outsourcing) करण्यास हरकत नाही.

काही अपवादात्मक परिस्थितीमध्ये धरण सुरक्षेत धोका निर्माण झाला असल्यास व सदरील धरण सुरक्षिततेची कामे जर वरीलप्रमाणे नमूद केलेल्या अपवादात्मक परिस्थितीमध्ये यांत्रिकी शाळेच्या कर्मशाळेच्या त्यांच्याकडे उपलब्ध साधन सामुग्री, उपकरणे, कुशल मनुष्यबळ वापरुन करणे शक्य नसेल तर अशावेळी सदरील कामे इतर मार्गाने करण्यास हरकत नसावी.असे काम झाल्यानंतर एक आठवडयात शासनास अहवाल सादर करावा. शासनाचे वरील निर्देश यांत्रिकी संघटनेमार्फत केल्या जाणाऱ्या सर्व प्रकारच्या कामांसाठी असून जास्तीतजास्त कामे यांत्रिकी संघटनेमार्फत खातेअंतर्गत (Departmentally) उपलब्ध असलेल्या साधन सामुग्री, उपकरणे, कुशल / अकुशल मनुष्यबळ वापरुन यांत्रिकी संघटनेच्या दापोडी व इतर विविध प्रादेशिक कर्मशाळेमध्ये करणे बंधनकारक राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१४१०२८१४५५५४१८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Ravindra Eknath Upasani

Digitally signed by Ravindra Eknath Upasani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ravindra Eknath Upasani
Date: 2014.10.28 15:15:21 +05'30'

(र. ए. उपासनी)
शासनाचे उप सचिव

प्रति,

१) स्वीय सहायक, प्रधान सचिव(जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२) स्वीय सहायक, प्रधान सचिव(लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

३) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
४) कार्यकारी संचालक, गोदावरी व मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
५) कार्यकारी संचालक, कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पूणे
६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
७) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
८) स्वीय सहायक, सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) मुख्य अभियंता (यां), जलसंपदा विभाग, नाशिक
१०) सर्व मुख्य अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग
११) स्वीय सहायक, सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य व यांत्रिकी), जलसंपदा विभाग
१३) सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व कार्यकारी अभियंता (स्थापत्य व यांत्रिकी), जलसंपदा विभाग

प्रत:- यांत्रिकी कार्यासन संग्रहार्थ